अचानक नाहीशा झालेल्या व ठावठिकाणा माहित नसलेल्या शासकीय कर्मचारी यांच्या कुटुंबियांना कुटुंबनिवृत्तीवेतन व उपदान मंजूर करणेबाबत.
श्री.सिकंदर महिबुब महाबरी, कनिष्ठ लिपीक

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२२/प्र.क्र.७५/सेवा-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख:-१७ मे, २०२३

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः सेनिवे-१०३९/४९१/सेवा-४, दि. ०५.०७.१९९१,
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः सेनिवे-१०९३/१८०/सेवा-४, दि.०७.१०.१९९३,
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र. मुअ (पुणे)/का १/ चौ.को./६७५६/सन २०२२, दि.२८.११.२०२२.

**प्रस्तावना :-**

श्री. सिकंदर महिबुब महाबरी, कनिष्ठ लिपीक हे कार्यकारी अभियंता, विशेष प्रकल्प, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर अंतर्गत उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, गगनबावडा या कार्यालयात कार्यरत होते. श्री.महाबरी, कनिष्ठ लिपीक हे दि. ०४.१.२००७ पासून बेपत्ता झाले आहेत. श्री.सिकंदर महिबुब महाबरी हे बेपत्ता झाल्याची तक्रार त्यांचा भाऊ श्री.रियाज महिबुब महाबरी यांनी दि. १३.०४.२००७ रोजी गगनबावडा पोलीस ठाणे मिसिंग रजिस्टर नंबर ०३/२००७ नुसार मिसिंग दाखल केले आहे. सदरच्या तपासास ०७ वर्ष पुर्ण होऊनही बेपत्ता व्यक्ती अद्याप मिळून आलेली नाही, असे सहा.पोलीस उपनिरीक्षक, गगनबावडा पो.ठाणे यांच्या दि.२०.०५.२०१४ च्या पत्रात नमूद आहे.

२. श्री. सिकंदर महिबुब महाबरी, कनिष्ठ लिपीक यांना अचानक बेपत्ता होऊन सात वर्षापेक्षा जास्त कालावधी पूर्ण झालेला आहे. श्री. सिकंदर महिबुब महाबरी यांची पत्नी श्रीमती शबनम सिकंदर महाबरी यांनी दि.०७.०७.२०२१ रोजीचे मे.दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर, इस्लामपूर यांचे वारसा प्रमाणपत्र सादर केले आहे. श्री. सिकंदर महिबुब महाबरी यांची वारस पत्नी श्रीमती शबनम सिकंदर महाबरी यांना कुटुंब निवृत्तीवेतन व उपदान मंजूर करण्याची विनंती मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधीन क्र. ३ च्या पत्रान्वये केली आहे. सदर प्रस्तावासोबत बेपत्ता श्री. सिकंदर महिबुब महाबरी यांच्या पत्नी श्रीमती शबनम सिकंदर महाबरी यांचे मा.दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर, इस्लामपूर यांचे वारसा प्रमाणपत्र, क्षतिपूर्ती बंधपत्र (INDEMNITY BOND), प्रथम खबरी अहवाल, संबंधित पोलीस स्टेशनचे अंतिम अहवाल इ. कागदपत्रांसह प्रस्ताव सादर केला आहे. श्री.सिकंदर महिबुब महाबरी यांचे मा. न्यायालयाने ठरवून दिलेले वारस पत्नी श्रीमती शबनम सिकंदर महाबरी यांना कुटंब निवृत्तीवेतन व उपदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री. सिकंदर महिबुब महाबरी, कनिष्ठ लिपीक, उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, गगनबावडा हे दि. ०४.१.२००७ पासून बेपत्ता होऊन ७ वर्षापेक्षा अधिक कालावधी झाल्याने मा.दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर, इस्लामपूर यांनी श्री. सिकंदर महिबुब महाबरी यांना दि.१६.०२.२०२१ रोजीच्या न्यायनिर्णयान्वये ते मयत आहेत असे गृहीत स्पष्ट होत असल्याने श्रीमती शबनम सिकंदर महाबरी यांना वारसा प्रमाणपत्र दिले आहे. त्यानुषंगाने श्री. सिकंदर महिबुब महाबरी यांचे वारस, पत्नी श्रीमती शबनम सिकंदर महाबरी यांना कुटंब निवृत्तीवेतन व सेवा उपदान प्रदान करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ०५.०७.१९९१ अन्वये विहित केलेल्या नमुन्यात क्षतिपूर्ती बंधपत्र परिपूर्ण करुन व इतर आवश्यक बाबींची पूर्तता करुन घेण्याची जबाबदारी अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर यांनी घ्यावी. तसेच सदर प्रकरण महालेखापाल कार्यालयाकडे सादर करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन केले जाईल याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि.०५.०७.१९९१, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.सेनिवे-१०९३/१८०/सेवा-४, दि.०७.१०.१९९३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.सेनिवे-१०९४/१५६/सेवा-४, दि.२६.०६.१९९५ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.सेनिवे-१०००/ प्र.क्र.८३/ सेवा-४, दि.०३.०७.२००० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१७१८०५३०१३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JAYANT SHARAD SAGADE

Digitally signed by JAYANT SHARAD SAGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a6fd5f8313a5dbbc809e855be10e149644ddc66d66f20f36d4d55bcfb56ceb55, pseudonym=09537E97F47715807C41648D1F58C8CB3EC27E76, serialNumber=5CAF6324C416282449C4078681A5B8972EB1D149920D77CC78A41448DF59C4C9, cn=JAYANT SHARAD SAGADE
Date: 2023.05.17 18:07:38 +05'30'

**( ज. श. सागडे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे,
२. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर,
३. महालेखापाल (लेखा परीक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई/नागपूर,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, कोल्हापूर,
५. श्रीमती शबनम सिकंदर महाबरी, मु.पो.कोटभाग, वाळवा, जि.प.शाळा नं.१ जवळ, ता.वाळवा, जि.सांगली,
६. निवडनस्ती सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.